**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमांतर्गत लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथे अल्पसंख्याक समाजातील मुलींसाठी वसतीगृह बांधकामाचा अतिरीक्त राज्य हिश्श्यातील निधी योजनेच्या PFMS प्रणालीवरील Single Nodal Account या खात्यामध्ये जमा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अ.वि.वि-२०१४ प्र.क्र.१४१/का-७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: २८ /०३/२०२४

**संदर्भ :-**

१. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(९)/२०१३-PP-MsDP-MOMA,दि.३०.१२.२०१५.
२. शासन पत्र क्र. अविवि-२०१५/प्र.क्र ६८/का-७, दि.०३/०३/२०१६.
३. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२०१४/प्र.क्र.१४१/का-७, दि.३१/०३/२०१६.
४. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२०१४/प्र.क्र.१४१/का-७, दि.३०/०४/२०१६.
५. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.अविवि-२०१४/प्र.क्र.१४१/का-७, दि.१९/११/२०१८.
६. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२०१४/प्र.क्र.१४१/का-७, दि.१०/०९/२०२०.
७. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(९)/२०१३-PP-MsDP-MOMA, दि.१७.०८.२०२०.
८. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२०१४/प्र.क्र.१४१/का-७, दि.१४/०९/२०२२.
९. जिल्हाधिकारी कार्यालय, लातुर यांचे पत्र क्र. जा. क्र. २०२२-२३/अल्पसंख्यांक/ MsDP उदगीर मुलींचे वसतीगृह बांधकाम योजना/कार्या-२/२०५५, दि. २०/११/२०२३.

**प्रस्तावना :-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या बहु क्षेत्रीय विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील उदगीर, जि.लातुर येथील मुलींसाठी वसतीगृह बांधकामाचा रु. ५७९.४८ लाख किंमतीचा प्रस्ताव मा.मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय संनियंत्रण समितीच्या मान्यतेने केंद्र शासनास पाठविण्यात आला होता. संदर्भ क्र. (१) नुसार १२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) गठीत शक्तिप्रदान समितीने दि. १४/१२/२०१५ रोजी झालेल्या १०६ व्या बैठकीत लातुर जिल्ह्यातील उदगीर शहर येथे अल्पसंख्याक समाजातील मुलांसाठी १०० प्रवेशक्षमतेचे ०१ वसतीगृह इमारत बांधकामाच्या रु.३१०.०० लाख इतक्या किंमतीच्या प्रस्तावास मान्यता दिली असुन सदर कामात केंद्र:राज्य हिस्सा प्रमाण ५०:५० आहे. संदर्भ क्र. (२) अन्वये राज्यशासनाचा वसतीगृह प्रस्ताव मुलांसाठी नसुन मुलींसाठी असल्याचे केंद्र शासनास कळविण्यात आले. केंद्र शासनाच्या दि. २५/०५/२०१६ च्या शुद्धीपत्रकानुसार उदगीर शहर, जि. लातुर येथे **मुलींसाठी** वसतीगृह बांधकामाच्या रु.३१०.००/- लाख किंमतीच्या प्रस्तावास मान्यता दिली व सदर कामात निधी वितरणाचे केंद्र: राज्य प्रमाण ६०:४० असुन पहिल्या हप्त्यात कमी वितरीत झालेला निधी दुस-या हप्त्याच्या वेळी समायोजित करण्यात येणार आहे.

२. संदर्भ क्र. (६) व (८) नुसार उदगीर शहर, जिल्हा लातुर येथे अल्पसंख्यांक समाजातील मुलींच्या १०० क्षमतेच्या वसतिगृह इमारत बांधकामाकरीता पहिल्या व दुस-या हप्त्यातील केंद्र तसेच राज्य हिश्श्यातील एकुण अनुक्रमे रु. १८६.००/- लाख व रु. १२४.००/- लाख असा एकुण रु.३१०.००/- लाख इतका निधी जिल्हाधिकारी लातुर यांना वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र. (९) अन्वये विनंती केल्यानुसार उदगीर शहर, जिल्हा लातुर येथे अल्पसंख्याक समाजातील मुलींच्या १०० क्षमतेच्या वसतिगृह इमारत बांधकामाचा **अतिरीक्त राज्य हिश्श्यातील रु. ३८९.४१ लाख** इतका निधी जिल्हाधिकारी, लातुर यांना वितरीत करण्यापुर्वी योजनेच्या SNA खात्यावर जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमांतर्गत उदगीर शहर, जिल्हा लातुर येथे अल्पसंख्यांक समाजातील मुलींच्या १०० क्षमतेच्या वसतिगृह इमारत बांधकामाकरीता सुधारीत दर सुचीला अनुसरुन संदर्भ क्र.५ अन्वये मिळालेल्या प्रशासकीय मान्यतेसनुसार (प्र.मा. किंमत **रु.६९९.४१/- लाख** वजा **केंद्र हिस्सा रु.१८६ /-लाख** वजा **नियमित राज्य हिस्सा रु.१२४ लाख** जाता **अतिरीक्त राज्य हिस्सा रु.३८९.४१ लाख** ) **अतिरीक्त राज्य हिश्श्यातील रु.३८९.४१ /-लाख** इतका निधी अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना मंजूर करून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | योजना | युनिट किंमत | प्रशासकीय मान्यता किंमत (एकुण प्रकल्प किंमत) | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | अतिरीक्त राज्य हिस्सा | दि. १०.०९.२०२० रोजीच्य शा.नि द्वारे पहिल्या हप्त्यातील वितरीत निधी | | दि. १४.०९.२०२२ रोजीच्य शा.नि द्वारे दुस-या हप्त्यातील वितरीत निधी | | विभागाद्वारे वितरीत एकुण निधी | | वितरीत करावयाचा अतिरीक्त राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
| १ | अल्पसंख्याक मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे ०१ वसतीगृह इमारत बांधकाम | ३१० | ६९९.४१ | १८६ | १२४ | ३८९.४१ | ७७.५० | ७७.५० | १०८.५० | ४६.५० | १८६ | १२४ | ३८९.४१ |

२. उपरोक्त तक्त्यातील स्तभं क्र. (१४) मध्ये नमुद निधी अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना लातुर जिल्ह्यातील उदगीर शहर येथे अल्पसंख्यांक समाजातील मुलींच्या १०० क्षमतेच्या वसतिगृह इमारत बांधकामाकरीता सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उपसचिव (अर्थसंकल्प), अल्पसंख्याक विकास विभाग हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. **सदर रक्कम सलग्न करण्यात आलेल्या योजनेच्या** Single Nodal Account खाते क्र.40533345678 व IFSC CODE - SBIN0061524 या खात्या मध्ये जमा करण्यात यावी.

३. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत आतापर्यंत प्रकल्प निहाय निधीचे वितरण करण्यात येत होते. परंतु बऱ्याच वेळेस प्रकल्पाकरीता जागा उपलब्ध होत नसते किंवा दुसऱ्या एखाद्या कारणामुळे प्रकल्प सुरू होऊ शकत नाही त्यामुळे प्रकल्पाकरीता वितरीत करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील पहिल्या हप्त्यातील निधी अखर्चित राहतो. ही बाब विचारात घेऊन, केंद्र शासनाकडून यापुढे प्रकल्पनिहाय निधी वितरीत करण्यात येणार

नाही तसेच जर केंद्र शासनाकडून अगोदरच एखाद्या प्रकल्पाकरीता वितरीत करण्यात आलेला निधी राज्य शासनाकडे उपलब्ध असेल तर उपलब्ध असलेला निधी गरजेनुसार दुसरा प्रकल्प पूर्ण करण्याकरीता वापरू शकतील आणि प्रकल्प विहित वेळेत पूर्ण करतील, अशा मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यामुळे उपरोक्त तक्त्यातील बांधकामांना स्तंभ क्र.(१४) मध्ये नमूद केल्यानुसार निधी वितरीत करण्यात येत असून **सदर निधी गरजेनुसार त्याच बांधकांमाना किंवा इतर प्रकल्पाची गरज / प्रगती अहवाल (QPR) / सादर करण्यात आलेले उपयोगीताप्रमाणपत्रे (UC) याबाबी विचारात घेऊन इतर प्रकल्पांना सुध्दा गरजेनुसार निधी वितरीत करण्यात येईल.**

४. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार विषयांकीत बांधकामातंर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (केंद्र हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च ) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१) (१४) अल्पसंख्याक प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च ) (२२३५ ए २३१) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्तिय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, उपविभाग एक मधील अट क्र. २७ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकाराअंतर्गत व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३ मधील कार्यपद्धती व अटींची पुर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३२८१७५२४१३२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANAND NARAYANRAO BHONDVE

Digitally signed by ANAND NARAYANRAO BHONDVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=a11586f7ebf5942c9727d91c8c251f01dab61da28a62264d92646e4dc3827d4d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D040EF80427E869FA7C6F2F326EAF61F9B4591294C9BE6229580E816D54D3859, cn=ANAND NARAYANRAO BHONDVE
Date: 2024.03.28 18:02:16 +05'30'

**( आ.ना.भोंडवे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
४. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई.
५. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
६. नियोजन विभाग (कार्या.१४७५).
७. कक्ष अधिकारी (रोख शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
८. निवड नस्ती (का.७).